वितरण आदेश क्र.६
सन २०१४-१५

यशदा पुणे, या संस्थेच्या विस्तारासाठी मौजे, ताथवडे, ता. मुळशी, जिल्हा पुणे येथील सर्व्हे क्र.२४ मधील, क्षेत्र ४७ हेक्टर ६९ आर जमीनीस संरक्षित भिंतीचे बांधकामास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत. ( सन २०१४-१५ ) योजनांतर्गत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : यशदा -२०१४/१६०४/प्र.क्र.२३९/१४/१२-अ,**
हुतात्मा राजगुरू चौक,मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३० मार्च २०१५

**संदर्भ :-** १. सामान्य प्रशासन विभाग,शासन परिपत्रक क्र.बीयुडी१०१४/प्र.क्र. ९१ /२०१४/२५, दि.९ एप्रिल २०१४
२. वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थसं-२०१४/प्र.क्र.६६/अर्थसंकल्प-३, दि.१७.४.२०१४.
३. वित्त विभाग, परिपत्रक क्र. अंदाज २०१४/प्र. क्र.११०/अर्थ ३, दि.१ जुलै २०१४.
४. सामान्य प्रशासन विभाग,शासन परिपत्रक क्र.बीयुडी२०१४/प्र.क्र.९१ /२०१४/२५, दि. ३ जुलै, २०१४.
५. लेखाधिकारी, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन व्रबोधिनी, पुणे यांचे पत्र क्र.अंदाज २०१४-१५./प्लॅन २०१४ , दि.३.११.२०१४
६. वित्त विभाग, परिपत्रक क्र. अंदाज २०१३/प्र. क्र.८५/अर्थसंकल्प ३, दि.२ जानेवारी, २०१५ व दि.९ फेब्रुवारी, २०१५

**प्रस्तावना:-**

यशदा पुणे या संस्थेस, मागणी क्र. ए-४ २०७०-इतर प्रशासकीय सेवा ००३- प्रशिक्षण - (००)(०३)- यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनीस सहाय्यक अनुदान, ३१ सहाय्यक अनुदान ( २०७० ००७६) या योजनांतर्गत योजनेकरिता सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाकरिता १.ताथवडे कॅम्पस संरक्षित भिंत बांधण्याकरिता रु. ४०७.५० लाख २. सेंटर फॉर गुड गव्हर्नन्सकरिता रु.५९८.४० लाख असे एकूण रु.१०,०५,९०,०००/-( अक्षरी रूपये दहा कोटी, पाच लाख, नव्वद हजार फक्त) इतकी अथसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे.संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन परिपत्रकान्वये तरतूदीच्या अनुषंगाने, एप्रिल ते जुलै, २०१४ या ४ महिन्यांसाठी एकूण रु. ३३५.३० लाख एवढे लेखा अनुदान चार महिन्यांच्या खर्चासाठी देण्यात आले होते. तथापि, त्यामधून या लेखाशिर्षाखाली खर्च झालेला नाही.

२. आता यशदा पुणे, या संस्थेच्या विस्तारासाठी, मौजे, ताथवडे, जिल्हा पुणे येथील सर्व्हे क्र.२४ मधील क्षेत्र ४७ हेक्टर ६९ आर ही जमीन महसूल व वन विभागाच्या दि. ११.४.२०१२ च्या ज्ञापनान्वये सामान्य प्रशासन विभागास देण्यात आली आहे. जिल्हाधिकारी, पुणे यांनी सदर जमीन दि.१४.५.२०१२ च्या पत्रान्वये विहित अटी व शर्तीनुसार यशदा पुणे, यांना हस्तांतरीत केली आहे. या जागेसाठी संरक्षित भिंतीचे बांधकामाकरिता यशदा पुणे यांच्या दि. ६.८.२०१३ च्या नियामक मंडळाच्या ४३ व्या बैठकीन्वये सदर बांधकामाच्या प्रस्तावास मान्यता प्राप्त झाली आहे. त्यानुषंगाने संदर्भाधीन क्र.५ च्या पत्रान्वये रु. ४,०७,५०,०००/-(अक्षरी रूपये चार कोटी, सात लाख, पन्नास हजार फक्त) इतक्या रकमेचे अंदाजपत्रक, नकाशे व आराखडा, यशदा पुणे, यांनी शासनास सादर करुन निधीची मागणी केली आहे. त्यानुसार प्रस्तुत कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता व निधी वितरित करण्याकरिताचा प्रस्ताव यशदा पुणे ,यांनी संदर्भ क्र.५ च्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे.

**शासन निर्णय :-**

यशदा पुणे, या संस्थेसाठी सन २०१४-२०१५ या आर्थिक वर्षाच्या योजनांतर्गत खर्चासाठी संदर्भाधीन क्र.४ च्या परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये केलेल्या तरतूदीच्या अनुषंगाने संपूर्ण अनुदान नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधिन करण्यात आले आहे. संदर्भाधीन क्र. ६ च्या परिपत्रकानुसार एकूण अर्थसंकल्पीय अनुदानाच्या

७५% च्या मर्यादेत, रु.७५४.४३ लाख इतके सहायक अनुदान खर्चाकरिता, अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आले आहे.

२. प्रस्तुत कामांचे अंदाजपत्रक मंत्रालयीन सार्वजनिक बांधकाम विभागाने तपासले असून, प्रस्तुत कामासाठी एकूण रु.४,०७,५०,०००/- (अक्षरी रूपये चार कोटी, सात लाख, पन्नास हजार फक्त) इतकी रक्कम निश्चित केली आहे.सदरहू किंमत निश्चित करतांना सार्वजनिक बांधकाम विभागाकडून खालील बाबी नमूद करण्यात आल्या आहेत.

१. सदर अंदाजपत्रक कार्यकारी अभियंता, सा.बां. विभाग,पुणे यांनी तयार केले आहे व सक्षम अधिकारी म्हणून अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, पुणे यांनी साक्षांकित केले आहे.

२. संरक्षक भिंतीची एकूण लांबी ३२८० मी. इतकी असून Veracity Structural Consultancy यांनी तयार केलेल्या आराखडे तसेच, संकल्पचित्राप्रमाणे अंदाजपत्रक तयार करण्यात आले आहे.

३. अंदाजपत्रकामध्ये खालील बाबींचा समावेश आहे-

१) ३२८० रनिंग मीटर M-२० RCC Compound Wall

२) ५९० रनिंग मिटर Wire fencing

३) प्रवेशव्दार.

४. अंदाजपत्रके सन २०१३-१४ च्या पुणेच्या दरसूचीवर आधारित आहेत.

५. अंदाजपत्रकात आकस्मिक खर्च, सेंटेज चार्जेस, इन्शुरन्स इ. बाबींची तरतूद करण्यात आली आहे.

३. (अ) काम सुरु करण्यापूर्वी मांडणी, नकाशा तसेच, विस्तृत नकाशास वास्तूविशारदांकडून मंजूरी घेऊनच काम सुरु करावे.

(ब) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

वरीलप्रमाणे विषयाधीन कामास परिच्छेद ३ मधील (अ) व (ब) येथील अटींच्या अधिन राहून सार्वजनिक बांधकाम विभागाने प्रस्तुत कामासाठी रु.४,०७,५०,०००/-(अक्षरी रूपये चार कोटी, सात लाख, पन्नास हजार फक्त) इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे.

४. त्यानुसार यशदा पुणे या संस्थेस मौजे, ताथवडे, जिल्हा पुणे येथील सर्व्हे क्र.२४ मधील क्षेत्र ४७ हेक्टर ६९ आर या जमिनीच्या संरक्षित भिंतीचे बांधकामाकरिता रु. ४,०७,५०,०००/- ( चार कोटी, सात लाख, पन्नास हजार फक्त)) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास, सार्वजनिक बांधकाम विभागाने नमूद केलेल्या परिच्छेद क्र.३ मधील (अ) व (ब) येथील अटींच्या अधिन राहून तसेच, वित्त विभागाच्या वित्तिय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन, अनुक्र. ४,परिच्छेद क्र. २७ (२) आणि भाग पहिला, उपविभाग ५, अ.क्र.१, परिच्छेद १३४ नुसार प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या वित्तिय शक्तीचा वापर करुन व सदर अधिकारातील रकाना क्र.६ खालील अटींच्या अधीन राहून याव्दारे प्रशासकिय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

५. यासाठी होणारा खर्च **रु.४,०७,५०,०००/-( अक्षरी चार कोटी, सात लाख, पन्नास हजार फक्त**) मागणी क्र. ए-४ २०७०-इतर प्रशासकीय सेवा ००३- प्रशिक्षण-(००)(०३)- यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनीस सहाय्यक अनुदान, ३१-सहाय्यक अनुदाने, वेतनेतर (२०७० ००७६) या लेखाशीर्षाखाली सन २०१४-२०१५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

६. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर, काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र विहित वेळेत शासनास सादर करावे.

७. आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE ) यशदा पुणे, यांनी महालेखापाल, लेखापरीक्षा- महाराष्ट्र १, मुंबई यांना आणि शासनास तातडीने सादर करावे.

८. उपरोक्त अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, लेखापरीक्षा- महाराष्ट्र १,मुंबई यांना राहतील आणि त्याकरीता संबंधित संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

९. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग, नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या मान्यतेने अनुक्रमे अनौ.संदर्भ क्र. ९७/इमारती-३ दि.२५.२.२०१५, अनौ. संदर्भ क्र. १०३/१४४३, दि.२३.०३.२०१५ व अनौ.संदर्भ क्र.३११/१५/व्यय ४,दि.२५.०३.२०१५ च्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१५०३३०१८३११९३५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PATIL PRATIBHA MADHAV

Digitally signed by PATIL PRATIBHA MADHAV
DN: CN = PATIL PRATIBHA MADHAV, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = GAD,CID - 916982
Date: 2015.03.30 18:46:49 +05'30'

**( प्रतिभा मा. पाटील )**

**कार्यासन अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग.**

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
२. मा. अ.मु. स. (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. मा. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४. मा.प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५. महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे
६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
७. लेखाधिकारी ,यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे
८. सार्वजनिक बांधकाम विभाग, कार्यासन, इमारती-३
९. नियोजन विभाग, कार्यासन-१४४३
१०.वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प १४), मंत्रालय, मुंबई
११. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्रमांक-२५. मंत्रालय, मुंबई
१२.निवड नस्ती. (सामान्य प्रशासन विभाग/कार्या. १२ अ).